"रिट पिटीशन क्रमांक ४३८९/२००० कविता कौशिक विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर" याप्रकरणी स्थापन करण्यात आलेल्या त्रिसदस्यीय समितीसाठी अपेक्षित खर्च रु.३,००,०००/-च्या प्रस्तावास मान्यता देण्याबाबत....

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक एनआयएस ०९९९/९/(३२)/पीआरएस-२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक : ४ जून,२००१

पहा:- कारागृह महानिरीक्षक, कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जाक्र.रिपि/४३८९/केके/२०००/क-५(२),पुणे-१, दिनांक ३.३.२००१

<u>शासन निर्णय :-</u> "रिट पिटीशन क्रमांक ४३८९/२००० कविता कौशिक विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर " या प्रकरणी स्थापन करण्यात आलेल्या त्रिसदस्यीय समितीसाठी प्रवासभत्ता, दैनिकभत्ता इ. करिता रु.२,१५,०००/- (रुपये दोन लक्ष पंधरा हजार फक्त) व स्टेशनरी, झेरॉक्स, बायडिंग, टायपिंग, मानधन इ. करिता रु.८५,०००/- (रुपये पंच्याऐंशी हजार फक्त) एवढा अपेक्षित खर्च मिळून एकूण रु.३,००,०००/- (रुपये तीन लाख फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास मान्यता देण्याबाबत शासनाचा विचार चालू होता.

उपरोक्त प्रस्तावाच्या अनुषंगाने शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, रिट पिटीशन क्रमांक ४३८९/२००० कविता कौशिक विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर या प्रकरणी स्थापन करण्यात आलेल्या त्रिसदस्यीय समितीसाठी एकूण रुपये ३,००,०००/- (रुपये तीन लाख फक्त) एवढया अपेक्षीत खर्चाच्या प्रस्तावास त्याबाबतच्या खर्चाचा बाबवार तपशील शासनास सादर करण्याच्या अटीच्या अधीन राहून शासन या आदेशाद्वारे मान्यता देत आहे.

उपरोक्त खर्च मागणी क्र.बी-७-२०५६ तुरुंग (योजनेतर) ००१ संचालन व प्रशासन, ००१(एक) कारागृह महानिरीक्षणालय-०१ वेतन (मानधन)(२०५६००२६०१) -०३ प्रवास खर्च (२०५६००२६०३) व ०५ कार्यालयीन खर्च (२०५६००२६०५) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २००१-२००२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या ~~अनुदानातून भागविण्यात यावा.~~

हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक सीआर ३६४/२००१/व्यय-८, दि.१८.४.२००१ अन्वये देण्यात आलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

( सु. म. माने )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत,
कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक, मुख्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
उप सचिव (विधी), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांना माहितीस्तव सादर अग्रेषित.
अतिरिक्त शासकीय अभियोक्ता, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राद्वारे)
महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र मुंबई/नागपूर
महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा) महाराष्ट्र मुंबई/नागपूर
कोषागार अधिकारी, पुणे.
वित्त विभाग, व्यय-८
बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय
निवडनस्ती.